**महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाच्या आस्थापनेनवरील तांत्रिक संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबतचे धोरण निश्चित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृहनिर्माण विभाग**

**शासन आदेश क्रमांक : पदस्था-२०२३/प्र.क्र.६८/गृनिभू**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

३ रा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- ०१ एप्रिल, २०२५.

**<u>प्रस्तावना :-</u>**

कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कामे पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम- २००५ मधील तरतुदीनुसार म्हाड आस्थापनेवरील महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण व त्या अंतर्गत सर्व विभागीय मंडळांतील गट "अ" आणि गट "ब" (वर्ग-१ व वर्ग-२) संवर्गातील सर्व अधिकाऱ्यांच्या ३ वर्षांच्या कालावधीनंतर बदल्या करण्यात येतात.

म्हाड आस्थापनेवरील अधिकाऱ्यांना एका कार्यालयात / आस्थापनेवर / मंडळात ०३ वर्षांपेक्षा जास्त कालावधी उलटून गेल्यानंतरही तसेच, बदलीस पात्र असतानाही बदली न होता सदर पदावर कार्यरत असतात. तसेच, बदलीनंतर अथवा पदोन्नतीनंतरही सदर मंडळातील अधिकारी बदलीच्या अथवा पदोन्नतीच्या पदावर रुजू होत नाहीत.

म्हाडा प्राधिकरणाच्या दि.३०.०५.२०१६ च्या परिपत्रकान्वये मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळात बदलीने पदस्थापना देण्यापूर्वी संबंधित अधिकारी / कर्मचारी यांनी यापूर्वी मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळात काम करून ३ वर्षाचा कालावधी पूर्ण झालेला असणे आवश्यक आहे. तथापि, त्याची अंमलबजावणी होत नसल्याचेही निर्देशनास आले आहे.

त्याचप्रमाणे एखादा अधिकारी वर्षानुवर्षे एकाच मंडळात अथवा एकाच पदावर कित्येक वर्षे कार्यरत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्याअनुषंगाने महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण व त्या अंतर्गत सर्व विभागीय मंडळांतील तांत्रिक अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबतचे धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

म्हाडा आस्थापनेवरील तांत्रिक संवर्गातील अधिकारी/कर्मचाऱ्यांची बदलीने नियुक्ती अथवा पदोन्नतीने पदस्थापनेसाठी खालील तीन रकान्यात विभागणी करण्यात येत आहे :-

| रकाना-अ | रकाना-ब | रकाना-क |
|---|---|---|
| **कार्यालये / आस्थापना** | **कार्यालये / आस्थापना** | **कार्यालये / आस्थापना** |
| १.इमारत परवानगी कक्ष/ विशेष परवानगी कक्ष (Special Planning Authority) | १. कोकण मंडळ | १. म्हाड प्राधिकरण (गट-अ व गट-ब मध्ये नमूद केलेली कार्यालये/आस्थापना वगळून) |
| २.निवासी कार्यकारी अभियंता (मुंबई मंडळ) | २. पुणे मंडळ | २. नाशिक, छत्रपती संभाजीनगर, अमरावती व नागपूर मंडळ |
| ३.निवासी कार्यकारी अभियंता (मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ) | ३. मुंबई मंडळ (गट-अ मध्ये नमूद केलेली कार्यालये/आस्थापना वगळून) | |
| ४. मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ | ४. मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ (गट-अ मध्ये नमूद केलेली कार्यालये/आस्थापना वगळून) | |
| ५. झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण (प्रतिनियुक्तीने) | | |

२. उपरोक्त 'अ', 'ब' व 'क' रकान्यामध्ये येणारी कार्यालये / आस्थापना येथील तांत्रिक संवर्गातील अधिकारी / कर्मचाऱ्यांचा सेवाकालावधी खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे :-

- उपरोक्त रकाना-अ मधील नमुद ५ कार्यालयांपैकी कोणत्याही एका कार्यालयातील सलग सेवा कालावधी जास्तीत जास्त ३ वर्षे व संपूर्ण सेवाकालावधीत त्या संवर्गातील पदोन्नतीचे सर्व टप्पे विचारात घेऊन जास्तीत जास्त ६ वर्षे राहील. (६ वर्षाचा कालावधी हा रकाना- अ मधील संपूर्ण गटासाठी नसून त्यातील एका कार्यालयासाठी आहे.)
- उपरोक्त रकाना-अ मधील कार्यालयांमध्ये ३ वर्ष सेवा झाल्यानंतर रकाना-अ मधील कोणत्याही कार्यालयांत नियुक्ती द्यावयाची झाल्यास उपरोक्त रकाना-ब अथवा रकाना-क मधील कार्यालयात किमान ३ वर्षे सेवा करणे बंधनकारक राहील.
- उपरोक्त रकाना-ब मध्ये येणाऱ्या कार्यालयामध्ये कोणत्याही एका कार्यालयात सलग सेवा कालावधी जास्तीत जास्त ३ वर्षे व संपूर्ण सेवाकालावधीत त्या संवर्गातील पदोन्नतीचे सर्व टप्पे विचारात घेऊन जास्तीत जास्त ९ वर्षे राहील. (९ वर्षाचा कालावधी हा रकाना-ब मधील संपूर्ण गटासाठी नसून त्यातील एका कार्यालयासाठी आहे.)

- उपरोक्त रकाना-क मध्ये येणाऱ्या कार्यालयामध्ये संपूर्ण सेवा कालावधीतील कार्यकाळ अनिश्चित राहील. मात्र, बदलीच्या नियमानुसार संबंधित अधिकारी / कर्मचारी हे एका पदावरून दुसऱ्या पदासाठी ३ वर्षानंतर बदलीसाठी पात्र राहतील.
- अपवादात्मक परिस्थितीत उपरोक्त कोणत्याही रकान्यातील एका पदावरील सलग सेवा कालावधी हा ३ वर्षापेक्षा जास्त वाढवावयाचा झाल्यास विभागप्रमुखांच्या लेखी मान्यतेने आवश्यक कारणमिमांसेसह एक विशेष बाब म्हणून सविस्तर प्रस्ताव, मंजूरी देण्यास सक्षम असणाऱ्या प्राधिकाऱ्यास विहित मार्गाने सादर करणे आवश्यक राहील. तथापि, विशेष बाब म्हणून केलेल्या नियुक्तीचा कालावधी कोणत्याही परिस्थितीत १ वर्षापेक्षा जास्त असणार नाही.
- उपरोक्त तरतूदी तांत्रिक संवर्गातील कनिष्ठ अभियंता संवर्गापासून उपमुख्य अभियंता संवर्गापर्यंत सर्व संवर्गांना लागू राहतील.
- म्हाडा प्राधिकरणाच्या आस्थापनेवरील सरळसेवेने नियुक्ती करण्यात आलेल्या विविध संवर्गातील अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या नियुक्तीनंतर परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होण्यापूर्वी व त्यांच्या प्रथम नियुक्तीनंतर ३ वर्षांपर्यंत बदलीबाबतचे कोणतेही प्रस्ताव विचारात घेण्यात येऊ नयेत.
- सेवाविषयक बाबीसंबंधी अशासकीय व्यक्तींमार्फत शासनावर दबाव आणणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांविरुध्द संबंधित विभाग प्रमुख तसेच कार्यालय प्रमुख यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०६/०५/१९९५ रोजीच्या शासन परिपत्रकात नमूद केल्यानुसार कारवाई करावी.
- म्हाडा प्राधिकरण व त्याअंतर्गत येणाऱ्या विभागीय मंडळात विविध विषयांसंदर्भात विवक्षित सेवा / कामांसाठी विविध संवर्गातील सेवानिवृत्त अधिकारी यांची करार पद्धतीने नियुक्ती करताना सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१७.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कोणत्याही परिस्थितीत ३ वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी नियुक्त्या करण्यात येऊ नयेत.

३. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा प्राधिकरण यांनी म्हाडा प्राधिकरणातील अतांत्रिक संवर्गातील मिळकत व्यवस्थापक, प्रशासकीय अधिकारी, लेखा अधिकारी इत्यादी संवर्गात विशिष्ट पदांसाठी मोठया प्रमाणात शिफारशी प्राप्त होतात, त्यामुळे सदर संवर्गासाठी काही ठराविक आस्थापनेवर / मंडळामध्ये / कार्यालयामध्ये पदस्थापना करण्यासाठी प्राप्त होणाऱ्या शिफारशी विचारात घेऊन कार्यालयांची गट निश्चिती करण्याबाबतची कार्यवाही ६ महिन्यात करण्यात यावी. मात्र, त्यासाठी या वर्षीच्या नियतकालीक बदल्या न थांबविता त्या विहीत वेळेत होतील, याची दक्षता घेण्यात यावी.

४. म्हाड प्राधिकरणाच्या आस्थापनेवरील तांत्रिक संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत बदल्या झाल्यानंतर सेवा वर्ग करताना उपरोक्त नियमांचे उल्लंघन होणार नाही, याची दक्षता उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा प्राधिकरण यांनी घ्यावी. तसेच, सेवा

वर्ग करावयाच्या झाल्यास, बदली करण्यास सक्षम असणाऱ्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने करण्यात याव्यात.

५. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा यांनी वरीलप्रमाणे आढावा घेऊन ज्या कर्मचाऱ्यांचा / अधिकाऱ्यांचा एका कार्यालयातील एकूण सेवाकालावधी त्या संवर्गात पदोन्नतीचे सर्व टप्पे विचारात घेऊन ६ वर्षापेक्षा जास्त असेल, अशा कर्मचाऱ्यांची / अधिकाऱ्यांची सेवाकालावधीनिहाय ज्येष्ठता यादी तयार करुन त्यांची अन्यत्र बदली करावी / त्यांच्या बदलीचा प्रस्ताव सक्षम प्राधिकाऱ्यास सादर करावा.

६. सदर आदेश सन २०२५ च्या नियतकालीक बदल्यांसाठी लागू राहतील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०४०११५५११५८५००९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA NARAYAN KHETLE

Digitally signed by RAVINDRA NARAYAN KHETLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, 2.5.4.20=188518615e71d343f645c4620bd62f620f5f5af35f72932959997b73ec7e7c41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69DCF3660DD70A5F443CD1B17131804310A79BF3FE40409DFDA1FAD5E072E484, cn=RAVINDRA NARAYAN KHETLE
Date: 2025.04.01 16:11:10 +05'30'

**(रविंद्र खेतले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत :-

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
३) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उपमुख्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा. संसद सदस्य / विधानपरिषद सदस्य / विधानसभा सदस्य (सर्व)
७) अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, म्हाडा, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई.
९) मुख्य अधिकारी, मुंबई मंडळ /कोंकण मंडळ / झो.प.सु.मंडळ / मुं. इ. दु. व पु. मंडळ / पुणे मंडळ / नाशिक मंडळ / छत्रपती संभाजीनगर मंडळ / नागपूर मंडळ/ अमरावती मंडळ.
१०) सर्व उप सचिव /सर्व अवर सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) मा. अध्यक्ष / मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
१२) मा. सभापती / मा. उपसभापती विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
१३) मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
१४) मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१५) मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१६) सर्व कार्यासने, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवडनस्ती (गृनिभू), गृहनिर्माण भवन, मंत्रालय, मुंबई.